आयुष रुग्णालय, रत्नागिरी करीता जागा उपलब्ध करुन देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य ३अ**
गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक : ११ मार्च, २०२२

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०२०/प्र.क्र.२९/आरोग्य ३अ, दिनांक २२.०१.२०२१
२) जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे पत्र क्र. मशा/कार्या-४/जमीनवाटप-(२)/सीआर प्र.क्र. ५/२०१९, दिनांक २२.०२.२०२१
३) सहायक संचालक (आयुष), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्रमांक : राआसो/आयुष /रत्नागिरी/आयुष रुग्णालय/२०२१-२२/१०१०३५-३७/२१ दिनांक १०.१२.२०२१

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन अनुक्रमांक १) येथील दिनांक २२.०१.२०२१ च्या शासन निर्णयान्वये, प्रादेशिक मनोरुग्णालय, रत्नागिरी येथील शेती कंपाऊंड या ठिकाणीची २.५ एकर जागा आयुष रुग्णालयाला देण्यास मान्यता देण्यात आलेली होती. जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी दिनांक २२.०२.२०२१ च्या पत्रान्वये, प्रादेशिक मनोरुग्णालय, रत्नागिरी येथील प्रस्तावित जागा ही समतल नसून सुमारे ३५ मीटर लांबीच्या अतितीव्र उताराची असल्याने आयुष रुग्णालयाच्या इमारतीसाठी योग्य ठरणार नसल्याचे नमूद केले आहे. तसेच आयुष रुग्णालयाच्या इमारत बांधकामासाठी सदर जागेएवजी रत्नागिरी तालुक्यातील मौजे झाडगाव म्यु. बाहेर येथील महिला रुग्णालयाशेजारी, भूमापन क्रमांक ४२४/ब क्षेत्र २.०३.९० हे. आर पैकी २ एकर जागा उपलब्ध असल्याचे व सदरील जागा समतल असून इमारत बांधण्यास योग्य असल्याचे नमूद केले आहे. याअनुषंगाने दिनांक २२.०१.२०२१ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. रत्नागिरी जिल्ह्यामध्ये आयुष रुग्णालय स्थापन

करण्याच्या अनुषंगाने, सुधारीत ठिकाणाची जागा आयुष रुग्णालयाला देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

रत्नागिरी जिल्ह्यातील मौजे झाडगाव म्यु. बाहेर येथील महिला रुग्णालयाशेजारी, भूमापन क्रमांक ४२४/ब क्षेत्र २.०३.९० हे. आर पैकी २ एकर जागा, ३० खाटांचे आयुष रुग्णालयाकरीता उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१११११५२५२३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK NIVARTTI KENDRE

Digitally signed by DEEPAK NIVARTTI KENDRE
Date: 2022.03.11 12:46:29 +05'30'

( दी. नि. केंद्रे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १/ २, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, रत्नागिरी
४. संचालक, आरोग्य सेवा-१,आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
५. सहसंचालक (असंसर्गजन्यरोग), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, रत्नागिरी.
८. वैद्यकीय अधिक्षक, प्रादेशिक मनोरुग्णालय, रत्नागिरी.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी
१०. निवडनस्ती (आरोग्य-३ अ).